राष्ट्रीय फलोत्पादन अभियांनातंर्गत राबविण्यात येणा-या
डाळींबावरील तेलकट डाग रोग नियंत्रण कार्यक्रमासाठी
राज्य हिश्श्याचा निधी वितरीत करणेबाबत-सन २००९-१०

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक - राफअ २००९/प्र.क्र.१४४/९अे,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक ७ जानेवारी, २०१०

**वाचा** :- १) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांक राफअ-२००९/ प्र.क्र.१४१/ ९अे, दि.९ सप्टेंबर,२००९.
२) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक- एफ क्र.३३-१०/२००७-हॅार्ट, दि. २६ मे,२००९.
३) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक- एफ क्र.३३-३०/२००९-हॅार्ट, दि. १० जुलै,२००९
४) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण -१००६/प्र.क्र.१३१/कोषा.प्रशासन-५ दि. १५/५/२००७.
५) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांक - पूरक - १००९/प्र.क्र.७६ /२-अे , दि.६ जुलै,२००९.
६) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक- एफ क्र.३३-१०/२००७-हॅार्ट, दि. २६ ऑगस्ट,२००९
७) महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ,पुणे यांचे पत्र क्रमांकः- मराफवऔवमं/ बीबीडी/तंत्र-१/प्र.क्र.१२/४२०४/०९, दि. २६ ऑक्टोबर,२००९.

**प्रस्तावना :**

राष्ट्रीय फलोत्पादन अभियान (राफअ)अंतर्गत डाळींब पिकावरील तेलकट डाग रोगाच्या नियंत्रणासाठी आदर्श व्यवस्थापन पध्दतीचे पॅकेज राज्यात सन २००७-०८ पासून राबविण्यात येत आहे. सन २००७-०८ मध्ये देय पॅकेज करीता राज्य शासनाचा हिस्सा १५% इतका होता. सन २००८-०९ पासून सदर पॅकेजकरीता हिश्श्याचे प्रमाण केंद्र शासन ५० टक्के,राज्य शासन २५ टक्के व लाभार्थी शेतकरी २५ टक्के या प्रमाणात आहे.

सदर पॅकेजच्या सुधारीत कार्यक्रमानुसार सन २००७-०८ मधील कार्यक्रमाचा फरक व सन २००८-०९ मधील उर्वरित कार्यक्रम यासाठी रु.८२८४.३८लाख तर सन २००९-१० मध्ये राबविण्यात येणा-या तिस-या वर्षातील कार्यक्रमासाठी रु.७०८२.८४ लाख याप्रमाणे एकूण रु.१५३६७.२२ लाख रकमेची आवश्यकता आहे. त्यानुसार सदर पॅकेजचा सुधारीत कार्यक्रम सन २००९-१० मध्ये राबविण्यासाठी लागणा-या एकूण अनुदान रु.१५३६७.२२ लाख पैकी रु.१००००.०० लाख राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत राज्य शासनाने उपलब्ध करुन द्यावेत व उर्वरीत रु.५३६७.२२ लाख राष्ट्रीय फलोत्पादन अभियानांतर्गत उपलब्ध करुन देण्यात येतील असे केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भाधीन पत्र क्रमांक- ६ अन्वये कळविले आहे.

केंद्र शासनाकडून राफअच्या नियमित कार्यक्रमासाठी प्राप्त झालेल्या रु.८१७३.२० लाख एवढया अनुदानातून डाळींबावरील ऑईली स्पॅाट रोग नियंत्रण कार्यक्रम सन २००९-१० मध्ये राबविण्यासाठी अत्यावश्यकतेनुसार (Urgent needs) खर्च करण्यात यावा असे केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भाधीन पत्र क्रमांक-३ अन्वये कळविले आहे. त्यानुसार जिल्हयांच्या मागणीप्रमाणे रु.२०००.००लाख व रु.५.००लाख असे एकूण रु.२००५.०० लाख अनुदान (केंद्र भाग) मंडळ स्तरावरुन तातडीने वितरीत करण्यात आलेला आहे. त्याअपरोक्ष राज्य शासनाचा २५% हिस्सा रु.१००२.५० लाख आवश्यक असून हा हिस्सा उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

सन २००९-१० मध्ये राष्ट्रीय फलोत्पादन अभियानांतर्गत डाळींबावरील तेलकट डाग रोगाच्या नियंत्रण कार्यक्रमासाठी राष्ट्रीय फलोत्पादन अभियानाअंतर्गत प्राप्त झालेल्या केंद्र शासनाच्या रु.२००५.०० लाख इतक्या हिश्श्याच्या अपरोक्ष राज्य शासनाच्या हिश्श्यापोटी रु.१००२.५०लाख (रुपये शंभर कोटी दोन लाख पन्नास हजार फक्त) एवढी रक्कम वितरीत करण्यास राज्य शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. डाळींबावरील तेलकट डाग रोगाचा नियंत्रण कार्यक्रम केंद्र शासनाने विहित केलेल्या मार्गदर्शक सूचनानुसार राज्यात राबविण्यात यावा. या योजनेवर होणारा खर्च मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

३.  सदर रक्कम खालील लेखाशीर्षातील सन २००९-२०१० च्या मंजूर तरतूदींतून उपलब्ध करुन देण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

मागणी क्रमांक डी-३
२४०१- पीक संवर्धन
११९- बागायती व भाजीपाला पीक
११९ पंचवार्षिक योजनांतर्गत योजना
राज्य योजनांतर्गत योजना
(०१) (२०) - पीक संरक्षण योजना - राज्य योजना ( २४०१ ३२१५)
३३ अर्थसहाय्य

४.  या योजनेसाठी मंजूर केलेला निधी खर्च करण्यास व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांच्याकडे एक रकमी सुपूर्द करण्यासाठी सहाय्यक संचालक लेखा, कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५.  वरील प्रमाणे मंजूर केलेला निधी अर्थसंकल्पिय तरतुदीच्या मर्यादेत व मासिक निधी विवरण पत्राप्रमाणे वित्त विभागाने विकसीत केलेल्या " संगणकीय अर्थसंकल्प वितरण प्रणाली " मध्ये शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ४ व कृषि व पदुम विभागाच्या संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयाचे काटेकोरपणे अमंलबजावणी होईल यांची दक्षता आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी.

६.  सदर शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनुक्रमे १७५२/ १४३२ , दिनांक २९/१२ /२००९ व १४/१०,अर्थसंकल्प-१३ , दि.७/१/२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सकेतांक ( २००१००१०८१४४५७०००१) असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(वी.आ.राऊत )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा. मंत्री/राज्यमंत्री (फलोत्पादन)यांचे खाजगी सचिव
मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
प्रधान सचिव, विधान मंडळ सचिवालय, मुंबई
आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य,पुणे.
संचालक फलोत्पादन, कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे (१० प्रती)
सर्व संचालक/ सर्व सहसंचालक कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे,
सर्व विभागीय कृषी सहसंचालक,
सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
सहाय्यक संचालक (लेखा) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे ( १० प्रती )
महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता ) (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षाअधिकारी, मुंबई
संचालक लेखा व कोषागार अधिकारी, मुंबई ( २ प्रती)
सहसंचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई -३२,
सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य
माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
नियोजन विभाग,(कार्यासन -१४३२)
वित्त विभाग (व्यय-१ ) अर्थसंकल्प -३,१२,
सर्व सह सचिव/ उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, ( कृषी व फलो. मधील कार्यासने) कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई
मा.लोक आयुक्त / मा. उपलोकआयुक्त , नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ३२.
पुणे महानगर नियोजन समिती, विभागीय आयुक्तालय आवार निवाडा शाखा, पहिला मजला,पुणे-१.
निवड नस्ती